राष्ट्रीय शिक्षक पुरस्कार सन २०१७-२०१८
जिल्हा निवड समितीची नियुक्ती.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- पीटीसी-२०१८/प्र.क्र.७/टीएनटी-४.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०४ जूलै, २०१८

**संदर्भ** :- १) केंद्र शासनाचे पत्र क्र. एफ१-४/२०१७-एनएटी दिनांक १५ जून २०१८
२) शिक्षण संचालक माध्यमिक व उच्च माध्यमिक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.शिसं/Onlineराष्ट्रीय/ शिपु/ /२०१७-१८/विद्या शाखा,४४५२ दि.२८.६.२०१८

**शासन निर्णय:-**

संदर्भांकित क्र. १ च्या पत्रानुसार केंद्र शासनाने राष्ट्रीय शिक्षक पुरस्कार २०१७ च्या अनुषंगाने सुधारीत मार्गदर्शक तत्वे निश्चित केली आहेत. त्यानुसार राष्ट्रीय शिक्षक पुरस्कार २०१७ साठी खालीलप्रमाणे जिल्हा निवड समिती नियुक्त करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | शिक्षणाधिकारी (माध्यमिक) / शिक्षक निरीक्षक (मुंबईसाठी) | अध्यक्ष |
| २ | प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक व्यावसायिक विकास संस्था (DIECPD) किंवा त्यांचे प्रतिनिधी / संचालक, प्रादेशिक विद्याप्राधिकरण (मुंबईसाठी) | सदस्य |
| ३ | जिल्हाधिकारी यांनी नामनिर्देशित केलेला एक प्रथितयश शिक्षणतज्ञ | सदस्य |

२. राष्ट्रीय शिक्षक पुरस्कारासाठी केंद्र शासनाने दि.१५.६.२०१८ च्या पत्रान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. निवडी संदर्भात आवश्यक ती गुप्तता राखण्याची दक्षता निवड समितीने घ्यावी.

३. जिल्हा निवड समितीने ऑनलाईन पोर्टलव्दारे तीन नामांकने राज्य निवड समितीकडे दि.२४ जुलै, २०१८ पर्यंत पाठवावयाची आहेत. जिल्हा निवड समितीसाठी लॉगिन / पासवर्ड संबंधित जिल्हाधिकांऱ्याकडे ई-मेल व्दारे कळविण्यात येणार आहे. त्यामुळे सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक) / शिक्षक निरीक्षक (मुंबईसाठी) यांनी जिल्हाधिकारी यांचेकडे संपर्क साधावा. तसेच अ.क्र. ३ येथील सदस्यांचे नामनिर्देशन प्राप्त करुन घ्यावे.

४. अनुक्रमांक ३ येथील सदस्यांना समितीच्या कामकाजासाठी प्रवासभत्ता व दैनिकभत्ता नियमानुसार अनुज्ञेय असलेल्या दराने देण्यात यावा. मात्र त्यांना विमान प्रवास आणि रेल्वेच्या वातानुकुलीत प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही.

५. या सदस्यांचा प्रवासभत्ता व दैनिक भत्याचा खर्च "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण ८०, सर्वसाधारण, ००१, संचालन व प्रशासन (००)(०१) शिक्षण संचालक (२२०२ १०९१) ११, देशांतर्गत प्रवास खर्च (दत्तमत्त)" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ च्या मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. अशासकीय सदस्यांची देयके शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या कार्यालयाकडून अदा केली जातील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०४१३१४१२३२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

J. S. Raskar

Digitally signed by J. S. Raskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=04640d2030eaa3854379434ab85482042a072e8a601095b5f7aa8d67b9b02db2, cn=J. S. Raskar
Date: 2018.07.04 14:53:50 +05'30'

( ज. शि. रासकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य,पुणे
२. सर्व जिल्हाधिकारी
३.शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४.शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक ) ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
५.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
६.सर्व जिल्हयांचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक),सर्व शिक्षण निरिक्षक,बृहन्मुंबई.
७. सर्व प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक व्यावसायिक विकास संस्था ( DIECPD)
८. संचालक, प्रादेशिक विद्याप्राधिकरण, मुंबई.
९.मा. मुख्यमंत्राचे यांचे खाजगी सचिव,मुख्यमंत्र्याचे कार्यालय,मुंबई.
१०.मा.मंत्री,शालेय शिक्षण यांचे विशेष कार्यअधिकारी.
११.मा.अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.
१२.मा.प्रधान सचिव,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,
१३. सचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१४.निवड नस्ती, टीएनटी-४.